**नांदेड शहरातील नवा मोंढा शासकीय धान्य गोदामाच्या जुन्या जागेवर महानगरपालिके कडून उभारण्यात येणाऱ्या बांधा वापरा व हस्तांतरीत करा या तत्वावरील व्यापारी संकुल उभारणीच्या निविदा मंजुरी बाबत पारीत झालेल्या ठरावावरील स्थगिती उठविण्याबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नांमपा-२०२२/प्र.क्र.३१७/नवि-२४,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ९ मे,२०२३.

**संदर्भ :-** १) मा.श्री.प्रतापराव पाटील चिखलीकर,लोकसभा सदस्य,नांदेड यांचे पत्र दिनांक २.११.२०२२
२) शासन पत्र नगर विकास विभाग क्र.नांमपा-२०२२/प्र.क्र.३१७/नवि-२४,दि.३०.१२.२०२२.
३) आयुक्त,नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र.नांवाशमनपा/साबांवि/१४४९४/२०२३,दिनांक २३.१.२०२३

<u>**प्रस्तावना**</u> :-

उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील मा.श्री.प्रतापराव चिखलीकर,लोकसभा सदस्य यांच्या दिनांक २.११.२०२२ रोजीच्या प्राप्त झालेल्या पत्रावरील मा.उपमुख्यमंत्री महोदयांच्या निदेशास अनुसरुन दिनांक २८.१०.२०२२ रोजीच्या पारीत झालेल्या सर्वसाधारण ठरावावर संदर्भाधीन शासनपत्र क्र.२ दिनांक ३०.१२.२०२२ अन्वये स्थगिती देण्यात आली होती.

याबाबत, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेची बिकट आर्थिक स्थिती लक्षात घेता सदरचे व्यापारी संकुल महानगरपालिकेला स्वनिधीतून बांधणे शक्य होणार नसल्याने, सदर प्रकल्प बीओटी तत्वावर हाती घेण्यासाठी महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने मान्यता दिली आहे. त्यानुसार महानगरपालिका महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमानुसार तसेच नियमांचे काटेकोर पालन करुन कार्यवाही करण्यात आली आहे. यामध्ये कोणत्याही कायदेशिर तरतूदींचे उल्लंघन झालेले नाही असा अहवाल आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका यांनी शासनाने दिलेली स्थगिती तात्काळ उठविण्याबाबतची विनंती संदर्भ क्र.३ दिनांक २३.१.२०२३ नुसार केली आहे. या अनुसार, संदर्भाधीन शासन पत्र दिनांक ३०.१२.२०२२ च्या पत्रान्वये दिलेली स्थगिती उठविण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नगर विकास विभागाचे क्र.नांमपा-२०२२/प्र.क्र.३१७/नवि-२४,दिनांक ३०.१२.२०२२ पत्रान्वये नांदेड शहरातील नवा मोंढा शासकीय धान्य गोदामाच्या जुन्या जागेवर महानगरपालिकेकडून उभारण्यात येणाऱ्या बांधा वापरा व हस्तांतरीत करा या तत्वावरील व्यापारी संकुल उभारणीबाबतच्या, निविदा मंजुरीबाबत पारीत झालेल्या दिनांक २८.१०.२०२२ रोजीच्या सर्वसाधारण ठरावावर कोणतीही कार्यवाही करण्यास देण्यात आलेली स्थगिती याद्वारे उठविण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०२३०५०९१६१८१०८१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.05.09 16:19:31 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२
२) प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई ३२.
३) आयुक्त, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
४) जिल्हाधिकारी, नांदेड
५) निवड नस्ती (नवि-२४).